राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम
केंद्र हिश्श्यांतर्गत सर्वसाधारण या घटकासाठी
ग्रामीण पाणी पुरवठा योजनांसाठी अनुदाने
(लेखाशिर्ष २२१५ ९७९१)

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः राग्रापे-२०१८/ प्र.क्र.१५७/ पापु-१०**

७ वा मजला, गोकुलदास तेजपाल रुग्णालय इमारत संकुल,
लोकमान्य टिळक मार्ग, मंत्रालय, मुंबई-४०० ००१
तारीख: ३१ जानेवारी,२०१९.

**वाचा -**

१) केंद्र शासनाचे मंजूरी आदेश क्र. डब्लू-११०२०/१९७/२०१५- वॉटर-१, दि.११.१२.२०१८
२) वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अर्थसं-२०१७/प्र.क्र.७५/अर्थ-३, दिनांक ०२/०४/२०१८

**प्रस्तावना -**

राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम या केंद्र पुरुस्कृत कार्यक्रमांतर्गत केंद्र शासनाकडून प्राप्त झालेल्या केंद्र हिश्श्याच्या अनुदाना संदर्भात आर्थिक वर्ष २०१८-१९ मध्ये मागणी क्र. मागणी क्र. वाय-०२, लेखाशिर्ष २२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता, १०२ ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रम, ०२ जिल्हा परिषदांना योजनांतर्गत अनुदाने, (०२) (०२५) राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम (केंद्र हिस्सा) यासाठी अनुदाने, ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) (२२१५ ९७९१) या लेखाशिर्षाखाली सन २०१८-१९ मध्ये अर्थसंकल्पित केलेल्या निधीपैकी रु.१६०.६४६९ कोटी (सर्वसाधारण घटक) एवढा निधी राज्याच्या एकत्रित निधीत सुपुर्द केला आहे. सदर निधी अंमलबजावणी यंत्रणांना ग्रामीण पाणी पुरवठा योजनांसाठी मंजूर करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय-**

आर्थिक वर्ष २०१८-१९ मध्ये ग्रामीण नळ पाणी पुरवठा योजनांकरिता लेखाशिर्ष २२१५ ९७९१ या खाली रु.१६.७४ कोटी (रुपये सोळा कोटी चौऱ्हात्तर लाख मात्र) एवढा निधी महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई यांना सर्वसाधारण या घटकांसाठी अर्थसंकल्प प्रणालीव्दारे पुढील अटींवर मंजूर व मुक्त करण्यात येत आहे.

१) महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई यांनी या अनुदानातून केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे ठेवावेत. या शासन निर्णयातील अटी व शर्तीची व राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम या योजनेंतर्गत केंद्र शासनाने घालून दिलेल्या मार्गदर्शक सूचनांची संबंधित अमंलबजावणी यंत्रणांकडून पूर्तता होत आहे, याची शासनाला खात्री करून घेता यावी यासाठी महालेखपाल, महाराष्ट्र-१/२, मुंबई/ नागपूर यांना तसेच या विभागातील प्राधिकृत

केलेल्या अधिकाऱ्यास लेखा परिक्षणाकरिता संबंधित अमंलबजावणी यंत्रणांची पुस्तके व लेखे पाहण्याचा अधिकार राहील. तसेच महालेखापाल यांना त्यांचे काम योग्यरितीने पार पाडता यावे म्हणून संबंधित अंमलबजावणी यंत्रणा संपूर्ण मदत व सुविधा पुरवतील.

२) ग्राम विकास विभागाच्या शासन परिपत्रक क्र. आरसीएन-१०८९/ सीआर-३०२७/२८, दि.०५.०९.१९९० मधील सुचनेप्रमाणे या अनुदानांच्या खर्चाचा महालेखापाल कार्यालयात नोंदविलेल्या खर्चाशी ताळमेळ घालावा व ताळमेळाचे अहवाल विहीत दिनांकाना महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई यांनी विभागीय आयुक्त (विकास शाखा) यांना व या विभागातील कार्यासन पापु-०५ व पापु-२० ला सादर करावे.

३) या मंजूर अनुदानाची उपयोगिता प्रमाणपत्रे शासनास सादर करावीत

४) केंद्र व राज्य हिश्श्यातून केलेल्या खर्चाची नोंद न चुकता IMIS या योजना प्रणालीवर पुढीलप्रमाणे नोंद घेण्यात यावी तसेच सदर नोंदी वेळोवेळी अद्यावत करण्यात याव्यात.

क. भौतिकदृष्टया १०० पुर्ण परंतु आार्थिकदृष्टया अपूर्ण योजना

ख. >७५ ते >१०० भौतिकदृष्टया पुर्ण

ग. > ५० ते >७५ भौतिकदृष्टया पूर्ण

घ. > २५ ते >५० भौतिकदृष्टया पूर्ण

५) सर्वसाधारण घटकांतर्गत उपलब्ध करून दिलेला निधी कृती आराखडयात असलेल्या गावांच्या योजनांसाठीच खर्च करावा.

६) सदर रक्कम त्वरीत आहरीत करण्यात यावी.

२. या शासन निर्णयान्वये महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई यांना मुक्त करण्यात आलेला निधी रु. १६.७४ कोटी (अक्षरी रुपये सोळा कोटी चौऱ्हात्तर लाख मात्र ) याबाबत महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाचे संचालक ( वित्त ) (श्री. यशवंत बाबुराव पाटील) यांच्या स्वाक्षरीने तयार केलेले व अवर सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, (श्री. व. भि. माने) यांनी प्रतिस्वाक्षरीत केलेले देयक अधिदान व लेखा अधिकारी कार्यालय, मुंबई यांना सादर करण्यात यावे. संचालक (वित्त), (श्री. यशवंत बाबुराव पाटील) यांना महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाचे आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच अवर सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग (श्री. व. भि. माने) यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर रक्कम एनईएफटी (NEFT) प्रणालीद्वारे जीवन प्राधिकरण यांच्या खात्यात जमा करण्यात यावी.

३. यावर होणारा खर्च मागणी क्र. वाय-०२, लेखाशिर्ष २२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता, १०२ ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रम, ०२ जिल्हा परिषदांना योजनांतर्गत अनुदाने, (०२) (०२५) राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम (केंद्र हिस्सा) यासाठी अनुदाने, ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) (२२१५ ९७९१) या लेखाशिर्षाखाली सन २०१८-१९ साठी मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. सदर प्रकरणी वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अर्थसं-२०१७/प्र.क्र.७५/अर्थ-३, दिनांक ०२/०४/२०१८ अन्वये या विभागास प्रदान केलेल्या अधिकारात तसेच सदर परिपत्रकातील अटी व

शर्तीच्या अधीन राहून मुक्त करण्यात येत आहे. सदर परिपत्रकामधील तसेच परिपत्रकासोबतच्या परिशिष्टातील अनुक्रमांक १ ते ८ व क्र. ८ मधील तपासणी सूचीतील अनुक्रमांक १ ते १० मधील अटी व शर्तीची पुर्तता होत असल्याचे प्रमाणित करण्यात येत आहे. तसेच या आदेशान्वये मंजूर व मुक्त केलेली रु.१६.७४ कोटी (सर्वसाधारण घटक) एवढी केंद्र हिश्श्याची रक्कम महाराष्ट्र राज्याच्या एकत्रित निधीत जमा झाल्याची खात्री वित्त विभाग- अर्थोपाय शाखा यांच्याकडून करण्यात आलेली आहे (अनौपचारीक संदर्भ क्र.४/ अर्थोपाय, दि.०२.०१.२०१९)

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०१३११२५८५६५६२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ravindra Gorakh Bharate

Digitally signed by Ravindra Gorakh Bharate
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply and Sanitation Department, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=96ee74617e9bb0cdcfad343ca5dc2e158423ad4dd919bcae9a0b9fc9b413b60b, serialNumber=fd232eb47eb633cb760c7bd2acf421b01b1da040dc965254760018b5f4e33be5, cn=Ravindra Gorakh Bharate
Date: 2019.01.31 16:10:32 +05'30'

**डॉ. रविंद्र भराटे**
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता), महारष्ट्र-१-मुंबई/२- नागपुर,
२. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
३. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई
४. संचालक (वित्त) ,महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई,
५. मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, मुंबई,
६. पापु-०४/२०/२३, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई,
७. अपर मुख्य सचिव, पाणी पुरवठा विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहाय्यक,
८. निवडनस्ती पापु-१०.